<u>अर्थसंकल्पीय अनुदान सन २०१९-२०२०</u>
सन २०१८-१९ मध्ये निवड झालेल्या "जिल्हा स्मार्ट" ग्राम पंचायतींना निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१९/प्र.क्र.१८४/योजना-११

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :**

१) **शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१-अ/योजना-१, दि.२१.११.२०१६.**
२) **शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१-अ/योजना-११, दि.१६.४.२०१८.**
३) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१.४.२०१९.**
४) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.७.२०१९.**
५) **शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१८/प्र.क्र.३४५/योजना-११, दि.२९.८.२०१९ व शासन शुध्दीपत्रक दि.१६.१२.२०१९.**
६) **शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१८/प्र.क्र.३४५/योजना-११, दि.३१.८.२०१९.**
७) **शासन निर्णय क्रमांकः स्माग्रायो-२०१९/प्र.क्र.१८४/योजना-११, दि.२६.२.२०२०.**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय क्र.स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१/अ/योजना-१, दि.२१ नोव्हेंबर, २०१६ अन्वये, स्मार्ट ग्राम योजनेसाठी प्रथम व व्दितीय स्तरावरील तालुका व जिल्हा स्मार्ट ग्राम ग्रामपंचायतींना रोख स्वरुपात पारितोषिक वितरण करण्यात येईल अशी तरतूद आहे. त्यानुषंगाने, सन २०१८-१९ या वर्षाकरिता स्मार्ट म्हणुन निवड झालेल्या राज्यातील जिल्हा स्मार्ट ग्राम ग्रामपंचायतींना पुरस्कार देण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

राज्यातील ३५१ तालुका स्मार्ट ग्राम व ३४ जिल्हा स्मार्ट ग्राम म्हणून निवड झालेल्या ग्रामपंचायतीना अनुक्रमे रु.१०.०० लक्ष व रु.४०.०० लक्ष अशी पारितोषिकांची रक्कम अदा करण्यात येते. या योजनेकरिता सन २०१९-२० मध्ये मागणी क्रमांक-एल-३, २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य, (००) (०१) स्मार्ट ग्राम योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी पंचायत राज संस्थांना सहायक अनुदान (कार्यक्रम) -३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२५१५ १६७७) या लेखाशिर्षाखाली रु.८८,९०,००,०००/-इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली असली तरी, वित्त विभागाने दि.८.७.२०१९ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंल्पीय

तरतूदीच्या ६०% इतका निधी खर्च करण्यास परवानगी दिलेली असल्यामुळे रु.५३,३४,००,०००/-(रु.त्रेपन कोटी चौतीस लक्ष फक्त) इतका निधी वितरणासाठी उपलब्ध आहे.

२. वितरणासाठी उपलब्ध असलेल्या रु.५३,३४,००,०००/- (रु.त्रेपन कोटी चौतीस लक्ष फक्त) निधी पैकी सन २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये निवड झालेल्या तालुका स्मार्ट ग्रामपंचायतींना संदर्भाधिन दि.२९.८.२०१९ च्या शासन निर्णयान्वये व दि.१६.१२.२०१९ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये रु.५,६६,००,०००/- (रु.पाच कोटी सहासष्ट लक्ष फक्त) व सन २०१७-१८ करिता निवड झालेल्या जिल्हा स्मार्ट ग्राम पंचायतींना दि.३१.८.२०१९ च्या शासन निर्णयान्वये रु.१३,६०,००,०००/- (रुपये तेरा कोटी साठ लक्ष फक्त) व दि.२६.०२.२०२० च्या शासन निर्णयान्वये सन २०१८-१९ करिता निवड झालेल्या २५१ तालुका स्मार्ट ग्राम पंचायतींना रु.२१,९३,५०,३०६/- (रु.एकेविस कोटी त्र्यन्नव लक्ष पन्नास हजार तिनशे सहा फक्त) याप्रमाणे एकूण रु.४१,१९,५०,३०६/-/-(रु.एकेचाळीस कोटी एकोनवीस लक्ष पन्नास हजार तिनशे सहा फक्त) इतका निधी वितरीत करण्यात आला असून, सन २०१८-१९ करिता निवड झालेल्या जिल्हा स्मार्ट ग्राम पंचायतींना वितरीत करण्यासाठी रु. १२,१४,४९,६९४/- (रुपये बारा कोटी चौदा लक्ष एकोनपन्नास हजार सहाशे चौऱ्यान्नव फक्त) इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यासाठी शिल्लक आहे

३. सदर निधीमधून सन २०१८-१९ मध्ये निवड झालेल्या १२ जिल्हा स्मार्ट ग्रामपंचायतींची यादी प्राप्त झाली असल्याने १२ जिल्हा स्मार्ट ग्रामपंचायतीना प्रत्येकी रु.४०.०० लक्ष याप्रमाणे रु.४,८०,००,०००/-(रु.चार कोटी ऐंशी लक्ष फक्त) इतका निधी खालील जिल्हा परिषदांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | जिल्हा स्मार्ट ग्राम पंचायतींना बक्षीसाकरिता वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|
| १ | सांगली | ४०,००,००० |
| २ | सोलापूर | ४०,००,००० |
| ३ | कोल्हापूर | ४०,००,००० |
| ४ | नाशिक | ४०,००,००० |
| ५ | नंदुरबार | ४०,००,००० |
| ६ | अकोला | ४०,००,००० |
| ७ | यवतमाळ | ४०,००,००० |
| ८ | वाशिम | ४०,००,००० |
| ९ | नागपूर | ४०,००,००० |
| १० | चंद्रपूर | ४०,००,००० |
| ११ | भंडारा | ४०,००,००० |
| १२ | गोंदिया | ४०,००,००० |
| | एकूण | ४,८०,००,००० |

४. उपरोक्त निधी वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हा परिषदांच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी वितरीत करावयाच्या रकमा कोषागारातून काढुन संबंधितांना प्रदान करण्याची व्यवस्था करावी. याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद हे नियंत्रक अधिकारी राहतील. निधी वितरीत केल्यानंतर मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी तालुका स्मार्ट ग्रामपंचायतींना पारितोषिकांचा निधी संबंधित ग्रामपंचायतीमार्फत नाविण्यपूर्ण विकास कामासाठी खर्च केला आहे याबाबतची माहिती तातडीने सादर करावी.

५. शासन निर्णय क्रमांक-स्माग्रायो-२०१५/प्र.क्र.१५१-अ/योजना-११, दि.१६.४.२०१८ मधील तरतुदीन्वये, नाविण्यपूर्ण कामाऐवजी अन्य विकास कामे ज्या जिल्हा स्मार्ट ग्रामपंचायतींना पूर्ण करावयाची आहेत अशा विकास कामाकरिता शासनाची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

६. नियंत्रण अधिकाऱ्यांनी या योजनेकरिता झालेल्या /होणाऱ्या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयातील खर्चाच्या नोंदीशी ताळमेळ घेऊन प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयास झालेला खर्च यामध्ये तफावर राहणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी. सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) महालेखापाल कार्यालयास सादर करावे व त्याची प्रत शासनास पाठवावी.

७. सदरील खर्च सन २०१९-२० करिता लेखाशिर्ष मागणी क्रमांक-एल-३, २५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८-ग्रामपंचायतींना सहाय्य, (००) (०१) स्मार्ट ग्राम योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी पंचायत राज संस्थाना सहायक अनुदान (कार्यक्रम) -३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२५१५ १६७७) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/ प्र.क्र.४४ /अर्थ-३, दि.१.४.२०१९ व क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.७.२०१९ अन्वये दिलेल्या सूचनानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२७११०११३१७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

subhash Uttam Rathod

Digitally signed by subhash Uttam Rathod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4900ceadef378ce6953fc366d818c664ad0c54be36d6234bdc213e86d85816c2, cn=subhash Uttam Rathod
Date: 2020.02.27 11:22:05 +05'30'

**सुभाष राठोड**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधान परिषद, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व विधानसभा/विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्विय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. निवासी लेखा अधिकारी
११. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (सर्व)
१२. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
१३. सर्व विभागीय आयुक्त.
१४. सर्व जिल्हाधिकारी,.
१५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१६. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१८. सर्व जिल्हा परिषदांचे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत).
१९. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१५),मंत्रालय, मुंबई-३२.
२०. कक्ष अधिकारी (वित्त -१) ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
२१. निवड नस्ती (योजना-११)